**सहायक कक्ष अधिकारी यांच्या कक्ष अधिकारी पदावरील पदोन्नतीकरीताच्या विभागीय परीक्षेत यापूर्वी उत्तीर्ण न झालेल्या उमेदवारांचे परिक्षेसाठीचे अर्ज मागविण्याबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः परीक्षा २०२२/प्र.क्र.४६/का.१७**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
तारीख: ०३ मार्च, २०२३

वाचा:- १.समक्रमांकाचे दि. २२.१२.२०२२ रोजीचे परिपत्रक
२. शासन निर्णय क्र. विपनि २७२२/ प्र.क्र.८/का. १७, दि. ५ एप्रिल, २०२२

**शासन परिपत्रक -**

संदर्भ क्र. १ च्या परिपत्रकान्वये, सन २०२३ च्या कक्ष अधिकारी पदावरील पदोन्नतीसाठीच्या विभागीय परीक्षेला बसण्याची प्रथम संधी असलेल्या सहायक कक्ष अधिकारी यांना विभागीय परीक्षेचे प्रशिक्षण देण्यात येत असल्यामुळे, केवळ अशा उमेदवारांचे परीक्षेसाठीचे अर्ज प्रथम मागविण्यात आले होते. मात्र ज्यांची विभागीय परीक्षेची प्रथम संधी झाली आहे अशा उमेदवारांचे अर्ज स्वतंत्ररीत्या मागविण्यात येतील असे संदर्भ क्र. १ च्या परीपत्रकान्वये कळविण्यात आले होते.

त्यानुसार आता **सदर परिपत्रकाद्वारे सन २०२३ मधील कक्ष अधिकारी पदावरील पदोन्नतीसाठीची विभागीय परीक्षा ही ज्यांची प्रथम संधी नाही व जे यापूर्वीच्या परीक्षेत अद्यापही उत्तीर्ण झालेले नाहीत (यापूर्वीच्या परीक्षेत एक किंवा अनेक विषयात अनुत्तीर्ण झालेल्या अथवा यापूर्वीच्या परीक्षेला अनुपस्थित राहीलेल्या अथवा यापूर्वीच्या परीक्षेला अर्ज सादर न केलेल्या) अशा सर्व उमेदवारांचे परीक्षेसाठीचे अर्ज सोबत जोडलेल्या विहीत नमुन्यात मागविण्यात येत आहेत. संबंधित उमेदवारांनी सदर अर्ज या विभागाकडे दिनांक २१ मार्च, २०२३ पर्यंत त्यांच्या आस्थापनेमार्फत सादर करावेत.**

परीक्षेसाठीचा नवीन अभ्यासक्रम संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयाद्वारे निश्चित करून तो सन २०२२ च्या परीक्षेपासून लागू करण्यात आलेला आहे. सदर शासन निर्णयात, जून्या अभ्यासक्रमानुसार आयोजित परीक्षेत काही विषयांमध्ये अनुत्तीर्ण असलेल्या सहायक कक्ष अधिकाऱ्यांसाठी एक विशेष बाब म्हणून जुन्या अभ्यासक्रमानुसार दोन परीक्षांचे आयोजन करण्यात येईल असे नमूद करण्यात आले होते. त्यानुसार जुन्या अभ्यासक्रमानुसार एका परीक्षेचे आयोजन सन २०२२ मध्ये झालेले असून आता दुसऱ्या परीक्षेचे आयोजन सन २०२३ मधील परीक्षेत होणार आहे. त्यामुळे यानंतरच्या सर्व परीक्षा या केवळ नवीन अभ्यासक्रमानुसारच आयोजित होतील याची अर्ज करणाऱ्या सर्व उमेदवारांनी नोंद घ्यावी

सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी सदर परिपत्रक संबंधित सहायक कक्ष अधिकारी यांच्या ( प्रतिनियुक्ती वर / रजेवर असलेल्या सहायक कक्ष अधिकारी यांच्या सह ) लेखी स्वरुपात निदर्शनास आणावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२३०३०३१६५३३९४९०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASHANT ATAMARAM NAVGE

Digitally signed by PRASHANT ATAMARAM NAVGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=1aa19561cb9df10d5ed18ea1e2dd9c21abc8f013acd1abf32b760e9654b815c8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CC09BD62F22C3FE43CEF4F7746E3347362ED6D53CD5E3C1EDBC44748819D1016, cn=PRASHANT ATAMARAM NAVGE
Date: 2023.03.03 16:58:00 +05'30'

**( प्रशांत आ. नावगे )**
**अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) प्रधान सचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
(सहायक कक्ष अधिकारी (विधि) यांचेकरीता)

२) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
(आयोगातील सहायक कक्ष अधिकारी यांचेकरीता)

३) सह/उप सचिव (आस्थापना), सर्व मंत्रालयीन विभाग
(मंत्रालयीन संवर्गातील सहायक कक्ष अधिकारी यांचेकरीता)

४) निवडनस्ती.

## शासन परिपत्रक क्र. परीक्षा २०२२/प्र.क्र.४६/का.१७, दि. ०३ मार्च, २०२३ सोबत जोडलेल्या अर्जाचा नमूना

**कक्ष अधिकारी पदावरील पदोन्नतीसाठीच्या सन २०२३ पूर्वीच्या विभागीय परीक्षेत उत्तीर्ण न झालेल्या (यापूर्वीच्या परीक्षेत एक किंवा अनेक विषयात अनुत्तीर्ण झालेल्या अथवा यापूर्वीच्या परीक्षेला अनुपस्थित राहीलेल्या अथवा यापूर्वीच्या परीक्षेला अर्ज सादर न केलेल्या) उमेदवारांनी भरावयाच्या अर्जाचा नमूना**

(१) अर्जदाराचे संपूर्ण नाव व मोबाईल क्रमांक

(२) विभागाचे नाव

(३) सहायक कक्ष अधिकारी म्हणून नियुक्ती झाल्याचा दिनांक

(४) नवीन अभ्यासक्रमानुसार उमेदवार एकूण किंती पेपर मध्ये उत्तीर्ण झालेला आहे याबाबतची माहीती खालील रकान्यात भरावी व त्यासोबत परिक्षेच्या निकालाच्या आदेशाची प्रत जोडावी.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| वर्ष | | | | | |
| पेपर क्रमांक | | | | | |

(५) जुन्या अभ्यासक्रमानुसार उमेदवार एकूण किंती पेपर मध्ये उत्तीर्ण झालेला आहे याबाबतची माहीती खालील रकान्यात भरावी व त्यासोबत परिक्षेच्या निकालाच्या आदेशाची प्रत जोडावी

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| वर्ष | | | | | |
| पेपर क्रमांक | | | | | |